**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर,**
**( उत्तर), पैठण, जिल्हा - औरंगाबाद**
**(अनिवार्य ) ३६ सहाय्यक अनुदान ( वेतने ) ( सन २०२१-२०२२ )**
**( चौथा व अंतिम हप्ता )**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२१/प्र.क्र.४९/२०/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. १ नोव्हेंबर, २०२१

<u>वाचा</u> :
१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.६ एप्रिल, २०२१.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०२१/ प्र.क्र.८९ /२०२१/२५, दि.८ एप्रिल, २०२१
३. संचालक,मराठवाडा प्रशासकीय प्रशिक्षण प्रबोधिनी,पैठण औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२१/मप्रविप्रप्र/लेखा अनुदान/कावि १७६, दि.१५.०४.२०२१.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२१/प्र.क्र.४९/२०/१२ अ, दि.३० एप्रिल,२०२१
५. संचालक,मराठवाडा प्रशासकीय प्रशिक्षण प्रबोधिनी,पैठण औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२१/मप्रविप्रप्र/लेखा अनुदान/कावि २३६, दि.१.०६.२०२१.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२१/प्र.क्र.४९/२०/१२ अ, दि.२४ जुन,२०२१
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.२४ जुन, २०२१.
८. संचालक,मराठवाडा प्रशासकीय प्रशिक्षण प्रबोधिनी,पैठण औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२१/मप्रविप्रप्र/लेखा अनुदान/कावि ३०६, दि.२६.०७.२०२१.
९. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२१/प्र.क्र.४९/२०/१२ अ, दि.१ सप्टेंबर,२०२१
१०. संचालक,मराठवाडा प्रशासकीय प्रशिक्षण प्रबोधिनी,पैठण औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२१/मप्रविप्रप्र/लेखा अनुदान/कावि ४३६, दि.२२.१०.२०२१.

**शासन निर्णय**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेसाठी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.१४.७० लाख व वेतने रु.१००.०० लाख अशी एकूण रु. ११४.७० लाख (अक्षरी रुपये एकशे चौदा लाख, सत्तर हजार फक्त ) इतकी तरतूद करण्यात आली आहे.

२. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अनिवार्य खर्चाच्या ३६ सहायक अनुदान ( वेतने ) करिता, एकूण रु.१००.०० लाख इतक्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीनुसार मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद

या संस्थेला अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी एप्रिल महिन्यांकरिता संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकानुसार १०% च्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेले रु.१०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) इतके अनिवार्य ३६ सहाय्यक अनुदान (वेतने) " पहिला हप्ता " म्हणून संस्थेस संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आला आहे. त्यानंतर संस्थेस, संदर्भाधीन क्र .६ च्या शासन निर्णयानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या २५% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या खर्चासाठी रु.१५,००,००० /- (अक्षरी रुपये पंधरा लाख फक्त) अनिवार्य ३६ सहाय्यक अनुदान (वेतने) " दुसरा हप्ता " म्हणून मंजूर करण्यात आला आहे. तसेच संदर्भाधीन क्र .९ च्या शासन निर्णयानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ६०% च्या मर्यादेत, तथापि ,अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या खर्चासाठी रु.१२,००,००० /- (अक्षरी रुपये बारा लाख फक्त) इतके अनिवार्य ३६ सहाय्यक अनुदान (वेतने) " तिसरा हप्ता " म्हणून मंजूर करण्यात आला आहे.

३. आता, संस्थेस संदर्भाधीन क्र. ७ च्या एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ६०% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध असलेल्या उर्वरित सहायक अनुदानामधून अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या खर्चासाठी रु.१३.५३ लाख (अक्षरी रुपये तेरा लाख, त्रेपन्न हजार फक्त) इतके अनिवार्य ३६ सहाय्यक अनुदान (वेतने " चौथा हप्ता " म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

४. हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (अनिवार्य ) (२०७० ०७४६) याखाली सन २०२१ -२०२२ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने)" याखाली रु.१३.५३ लाख (अक्षरी रुपये तेरा लाख, त्रेपन्न हजार फक्त) याप्रमाणे भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आर्थिक वर्ष २०२१-२०२२ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

७. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

८. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग एक, अनु.क्र. २७, परिच्छेद क्र.१४९ नुसार व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०११७००५१७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAUMUDI RAVINDRA MARGAJ

Digitally signed by KAUMUDI RAVINDRA MARGAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=86b41f0c8c4d9cee4d4b8d9e6a2f78b63ed85082bb42fbb618ff074d97dd8622, pseudonym=43FC699496153D054F00DC1CAEF3B3B567AF254A, serialNumber=367FC9F5DAA15F4A0F19196A388639367A57BDA9ED0C495EA0C57DA461234AB8, cn=KAUMUDI RAVINDRA MARGAJ
Date: 2021.11.01 17:03:10 +05'30'

**( कौमुदी मरगज )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
४) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद
५) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद
६) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
७) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.
८) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१०) मा. अ.मु. स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)